**अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, वांद्रे (पूर्व) हे कार्यालय कोकण भवन, नवी मुंबई, जिल्हा ठाणे येथे स्थलांतरित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०१७/प्र.क्र.४०/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २२ ऑगस्ट, २०१७

**संदर्भ:-** १) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सार्वजनिक बांधकाम), कोकण भवन, मुंबई यांचे क्र. मुअराम /का-४/१३३५/२०१७ दि. २०.०६.२०१७ रोजीचे पत्र

२) अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई यांचे क्र. राममं /स्थलांतर /रेचिशा/१२०३/२०१७ दि. २१.०७.२०१७ रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

कलानगर जंक्शन येथील प्रस्तावित उड्डाणपुलाच्या बांधकामासाठी तेथील शासकीय कार्यालयाची जागा मुंबई महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई यांच्याकडे हस्तांतरित करावयाची असल्याने अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई हे कार्यालय पर्यायी जागेत स्थलांतरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कलानगर जंक्शन येथील प्रस्तावित उड्डाणपुलाचे बांधकाम मुंबई महानगर क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई (एम.एम.आर.डी.ए) यांचेमार्फत सुरू करावयाचे असल्याने संबंधित कार्यालयांची पर्यायी व्यवस्था खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | सद्यस्थितीत कार्यरत असलेले ठिकाण | स्थलांतरित करावयाचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, वांद्रे, मुंबई | कलानगर, वांद्रे, मुंबई | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, ठाणे ६ वा मजला (खोली क्र. ६२३ व ६२४) यांनी रिक्त केलेल्या जागी |
| २ | कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, ठाणे | सार्वजनिक बांधकाम परिसर ठाणे | राष्ट्रीय महामार्ग उपविभाग संकुल, गोकुळनगर परिसर, ठाणे |
| ३ | सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, ठाणे ६ वा मजला, कोकण भवन , नवी मुंबई | कोकण भवन, ६ वा मजला , नवी मुंबई | कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, ठाणे यांनी रिक्त केलेल्या जागेवर |

२. अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्या कार्यालयाचे स्थानांतरण मुंबई जिल्ह्यामधून ठाणे जिल्ह्यात होणार असून सदर कार्यालयाचे मुख्यालय ठाणे असणार आहे. सबब याबाबत संबंधित कोषागार कार्यालयाने वेतन आणि आहरण व संवितरण सुलभतेने होण्याच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२२१५२८४७८९१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Archana V. Walzade

Digitally signed by Archana V. Walzade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7d3665075bb5bbb010c2bb461401b054b9d7859491c0102e0f7740aa9f51fb7, cn=Archana V. Walzade
Date: 2017.08.22 15:19:29 +05'30'

**( अर्चना वालझाडे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
८. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सार्वजनिक बांधकाम), मुंबई.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
१०. अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई (मुख्यालय ठाणे)
११. सर्व सह सचिव, उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१५. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, ठाणे
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-११/ आकृतिबंध पुनर्रचना कक्ष), मंत्रालय, मुंबई ३२
१७. कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग
१८. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती).